मा.मंत्री (आरोग्य) यांनी विधि मंडळात दिलेल्या आश्वासन पूर्ततेच्या अनुषंगाने जिल्हा तांत्रिक संवर्गातील वैद्यकीय अधिका-यांना गट-अ संबोधण्याबाबत तांत्रिक समिती स्थापन करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

शासन निर्णय क्रमांकः संआसे-२०१६/प्र.क्र.९/(शिकाना),सेवा-१

गोकुलदास तेजपाल रूग्णालय, इमारत संकूल,

८ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग,

मंत्रालय, मुंबई - ४००००१

दिनांक : १४ ऑगस्ट, २०१८.

**वाचा :-**

१) संचालक, आरोग्य सेवा यांचे क्र.संआसे/मवैआसे/२अ/टे-५/गट-अ संबोधने/१६८३, दि.२९/०६/२०१८ रोजीचा प्रस्ताव.

**प्रस्तावना :-**

जिल्हा तांत्रिक सेवेतील वर्ग-३ वैद्यकीय अधिकाऱ्यांचे सार्वजनिक आरोग्य विभागाच्या दि.२८/०५/२००१ व दि.१७/१०/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-ब या संवर्गामध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या सहमतीने समावेशन झाले आहे. वित्त विभागाच्या दि.११/०२/२०१३ रोजीच्या शासन निर्णयानुसार (बक्षी समिती) या संवर्गातील वैद्यकीय अधिकाऱ्यांना गट-ब ची (रु.९३००-३४८०० अधिक ग्रेड पे ४६००/-) वेतनश्रेणी लागू आहे. तथापि, सदर वैद्यकीय अधिकाऱ्यांनी शासनाकडे वेळोवेळी त्यांना गट-अ ची वेतनश्रेणी (रु.१५६००-३९१०० अधिक ग्रेड पे ५४००/- अशी वेतनश्रेणी) लागू करण्याबाबत मागणी केली आहे. या संदर्भात या संवर्गातील अधिकाऱ्यांनी विविध न्यायाधिकरणामध्ये अर्ज सादर केली होती. या प्रकरणी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी मूळ अर्ज क्र.४६९/२०१२ मधील पुर्नविलोकन अर्ज क्र.२५/२०१५ या प्रकरणी दि.११/०७/२०१६ रोजी अंतिम आदेश देऊन सदर वैद्यकीय अधिकाऱ्यांना ५व्या वेतन आयोगामध्ये रु.८०००-१३५००/- व ६व्या वेतन आयोगामध्ये रु.९३००-३४८०० अधिक ग्रेड पे ५४००/- अशी वेतनश्रेणी लागू असल्याचे आदेश दिले आहेत. मा.न्यायाधिकरणाच्या सदर आदेशाच्या समान धर्तीवर अन्य न्यायाधिकरणांनी समान प्रकारचे आदेश दिले आहेत. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.४५२३/२०१७ या प्रकरणी दि.०५/०७/२०१८ रोजी दिलेल्या आदेशामध्ये

मा.न्यायाधिकरणाचा उपरोक्त दि.११/०७/२०१६ रोजीचा आदेश रद्द करुन प्रकरण नव्याने सुनावणीकरिता मा.न्यायाधिकरण, मुंबई यांच्याकडे वर्ग केला आहे. दरम्यान जिल्हा तांत्रिक सेवेतील वर्ग-३ वैद्यकीय अधिकाऱ्यांना गट-अ मध्ये समायोजन करण्याबाबत विधिमंडळात तारांकित प्रश्न क्र.३७६७८ उपस्थित करण्यात आला होता. सदर प्रश्नावर झालेल्या चर्चे दरम्यान मा. मंत्री (आरोग्य) यांनी विधिमंडळात सदर प्रकरणी तांत्रिक समिती सादर करण्यात येईल, असे आश्वासन दिले आहे. सदर आश्वासन पूर्तता करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्या अनुषंगाने शासन आता पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहेत.

## शासन निर्णय :-

जिल्हा तांत्रिक सेवेतील वर्ग-३ वैद्यकीय अधिकाऱ्यांचे सार्वजनिक आरोग्य विभागाच्या दि.२८/०५/२००१ व दि.१७/१०/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-ब या संवर्गामध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या सहमतीने समावेशन झाले आहे. या संवर्गातील वैद्यकीय अधिकाऱ्यांना गट-अ संबोधने/गट-अ चा दर्जा व वेतनश्रेणी लागू करता येईल किंवा कसे या बाबीचा अभ्यास करुन शिफारस करण्याकरिता खालील प्रमाणे तांत्रिक समितीची स्थापना करण्यात येत आहे.

तांत्रिक समितीची रचना खालीलप्रमाणे असावी-

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई- अध्यक्ष
२) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई-सदस्य
३) सहसंचालक,(अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई-सदस्य सचिव
४) सहसचिव/उपसचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-सदस्य
५) सहसचिव/उपसचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-सदस्य
६) सहसचिव/उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-सदस्य
७) सहसचिव/उपसचिव (सेवा-१), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई-सदस्य
८) मॅग्मो संघटेने अधिकृत सदस्य प्रतिनिधी-सदस्य

उपरोक्त तांत्रिक समितीची कार्यकक्षा पुढील प्रमाणे असावी-

१) जिल्हा तांत्रिक संवर्गातील वर्ग-३ वैद्यकीय अधिकाऱ्यांचे सार्वजनिक आरोग्य विभागाच्या दि.२८/०५/२००१ व दि.१७/१०/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-ब संवर्गामध्ये समावेशन झाले आहे. या संवर्गातील अधिकाऱ्यांना गट-अ संबोधने/गट-अ चा दर्जा व वेतनश्रेणी लागू करणे शक्य आहे किंवा कसे, ही बाब उपलब्ध कागदपत्रांच्या / प्रचलित शासकीय नियम व धोरणांच्या/न्यायालयीन निर्णयांच्या आधारे तपासणे.

२) उपरोक्त प्रमाणे तपासणी करुन शासनाला ३ महिन्याच्या कालावधीमध्ये अहवाल/शिफारशी सादर करणे.

३) तांत्रिक समितीची बैठक वेळोवेळी सदस्य सचिव यांनी समितीचे अध्यक्ष यांच्या निर्देशानुसार आयोजित करावी. तांत्रिक समितीचा सर्व पत्रव्यवहार करणे/बैठकीचे इतिवृत्त तयार करणे, ही जबाबदारी सदस्य सचिव यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८१४१३१५४८३७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R More

Digitally signed by Sanjay R More
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7256abb8dd472637941e581488fb02eda9e0d6b701c434bcf471a0d525f80681, cn=Sanjay R More
Date: 2018.08.16 11:57:08 +05'30'

**(सं.रा.मोरे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१.मा.मंत्री (आरोग्य) यांचे स्वीय सहायक

२.आयुक्त, आरोग्य सेवा तथा राष्ट्रीय आरोग्य अभियान संचालक, मुंबई.

३.संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

४. प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई

५. अप्पर मुख्य सचिव,सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. अ.मु.स.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

७. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

८. प्रधान सचिव (आरोग्य) यांचे स्वीय सहायक

९. मॅग्मो (आयुर्वेद) यांचे प्रतिनिधी.

१०. निवडनस्ती (सेवा-१)